**सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील संचालक (गट-अ) या पदावर नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. नियुक्ती- २०२२/प्र.क्र.१०८/कार्या.२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२३.

वाचा: उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे क्रमांक: जीडीआर-२४२२/प्र.क्र.३७/२०२२/अठ्ठावीस, दिनांक ३०/११/२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दि.३०/११/२०२२ पत्रान्वये संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे ब्रिगेडियर राजेश किसन गायकवाड (निवृत्त) यांची शिफारस केली आहे. सदर पदावर ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त)यांना नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

सैनिक कल्याण विभागातील संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे, गट-अ या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या ब्रिगेडियर राजेश किसन गायकवाड (निवृत्त) यांची सातव्या आगोगानुसार वेतन स्तर एस-२७: रु.१,२३,१००-२,१५,९०० या वेतनश्रेणी मध्ये महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९(४३) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार त्यांची तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. **ब्रिगेडियर राजेश किसन गायकवाड (निवृत्त) यांना या पदाचा कार्यभार ज्या दिनांकास स्विकारतील त्या दिनांकापासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.**

१) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांनी सदरहू आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या कालावधीत रुजू होणे आवश्यक आहे. जर ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) हे सदर मुदतीत रुजू झाले नाहीत तर त्यांच्या नियुक्तीचे आदेश कोणतीही पूर्वसूचना न देता रद्द करण्यात येतील.

२) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना नियुक्तीसाठी विहित केलेल्या ३० दिवसांच्या कालावधीत अपवादात्मक परिस्थितीत रुजू होणे शक्य नसेल तर त्यांनी तात्काळ समर्थनीय कारणांसह अर्ज शासनाकडे सादर करावा. याबाबतची तपासणी करुन रुजू होण्यासाठी कालावधी वाढवून देणे आवश्यक आहे, अशी परिस्थिती असल्याची खात्री पटल्यावर संबंधित त्यांना नेमणूकीच्या पदावर हजर होण्यासाठी कालावधी वाढवून देण्याबाबत शासनस्तरावर निर्णय घेण्यात येईल.

३) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना नियुक्ती स्विकारण्यासाठी करावा लागणारा प्रवासखर्च स्वत: करणे आवश्यक आहे.

४) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२ जून २०२१ मधील नविन परिविक्षाधीन धोरण लागू राहील. त्यानुसार त्यांचा परिविक्षाधीन कालावधी दोन वर्षाचा असेल. परिविक्षाधीन कालावधीतील त्यांचे काम व वर्तणूक समाधानकारक नसेल तर त्यांची सदर शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

५) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात आली आहे. ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांचा साक्षांकन नमूना प्राप्त झाला असून तो त्याच्या संबंधीत पोलीस अधीक्षक कार्यालयास पाठविण्यात आलेला आहे. सदर अहवाल समाधानकारक नसेल तर त्यांची सदर शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

६) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांची वैद्यकीय तपासणी करण्यात आली असून त्यांचा वैद्यकीय अहवाल प्राप्त झाला आहे.

७) हिंदी व मराठी भाषा परीक्षेसबंधी केलेल्या नियमानुसार जर ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांनी अगोदर उपरोक्त नमुद परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना सदरहू परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, त्यांना ती परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

८) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांनी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.६१/२००१/३९ दिनांक १९ मार्च, २००३ मधील तरतूदीनुसार संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान असल्याबाबतचे शासन मान्य प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करणे आवश्यक राहील.

९) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांचे कामकाज समाधानकारक नाही असे आढळून आल्यास किंवा त्यांची वर्तणूक शासकीय सेवकास शोभेशी नाही असे आढळून आल्यास, त्यांच्या सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

१०) ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असेल तर त्यांनी परिपत्रक सामन्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान एक महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. शासनास या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस दिली जाईल. मात्र गैरशिस्त,सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी सेवा समाप्त करताना वरील उमेदवारांला नोटीस देण्याचे शासनास बंधन राहणार नाही. हे नोटीसीचे नियम या नंतर वेळोवेळी होणा-या नियमांतील बदलाच्या अधिन राहतील.

११) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार दि.०१ नोव्हेंबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होते त्यांना नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तीवेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन ) नियम १९८२ व महराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरणार नाही.

१२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे, गट-अ संवर्गासाठी निश्चित केलेल्या सेवा शर्ती ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना लागू राहतील.

१३) दिनांक १४/०७/२०२१ या अधिसुचनेनुसार संचालक या संवर्गात एकच पद असल्याने ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना महसूल विभाग वाटप अधिनियम लागू होणार नाही.

१४) वर नमूद केलेल्या विनिर्दिष्ट अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या गट-अ अधिकाऱ्यांना लागू असलेले सर्व नागरी सेवाविषयक नियम ब्रिगेडियर गायकवाड (निवृत्त) यांना लागू राहतील.

३. सैनिक कल्याण विभागाच्या स्तरावर या संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवाराची उक्त अटी व शर्तीची पुर्तता करुन घ्यावी व तसा अहवाल शासनास सादर करावा. विहित कालावधीत उमेदवार हजर न झाल्यास त्याची माहिती शासनास वेळीच उपलब्ध करून घ्यावी.

४. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२२१६२९३०९८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGANDHA DEEPAK PAWAR

Digitally signed by SUGANDHA DEEPAK PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=d4ecddac21f58159928daa9563eab597448bd1556ca3f9caa9101e05e9a13341, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D94472B912CB3702FBA035D0A51948B4F9C9AE9051C2DEE02FFCA4B1014CEA, cn=SUGANDHA DEEPAK PAWAR
Date: 2023.02.23 16:21:09 +05'30'

**( सुगंधा दि. पवार )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे.
३) महालेखापाल (लेखा व परीक्षा) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ४०० ००१ (पत्राने)
६) जिल्हाधिकारी, पुणे
८) ब्रिगेडियर राजेश किसन गायकवाड (निवृत्त) एन.सी.सी.ग्रुप हेडक्वार्टर,सेनापती बापट मार्ग, सिंबॉसिस महाविद्यालयासमोर पुणे-४११ ००४
९) जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) संबंधितांची वैयक्तिक नस्ती.
१३) निवडनस्ती.